प्रकाश मंडळ, पुणें

# अर्धचंद्र



**पण्डित सप्रे,** बी. ए.

यशोधन, विरहतरंग, प्रवासी, इत्यादि पुस्तकांचे
वाचक आणि प्रस्तुत लिखाणाचे लेखक



प्रथमावृत्ति

१ एप्रिल १९३८ ] [ किंमत १२ आणे

# प्रकाशकाचे दोन शब्द

उदयोन्मुख व कलापूर्ण 'अर्धचंद्रा'नें '**प्रकाश मंडळा**'च्या वाङ्मय-सेवेस प्रारंभ करण्याचा सुयोग जमून आल्याबद्दल मला फार आनंद वाटतो.

प्रकाशनाची जबाबदारी घेणें मजसारख्या केवळ श्रमजीवी मनुष्यास बरेंच धोक्याचें; विशेषतः काव्यसंग्रहाचें प्रकाशन व तें नवोदित कवि, अननुभवी प्रकाशक व अपरिचित प्रस्तावनालेखक यांनीं जमवून आणावयाचें. यावरून सर्वच वेड्यांचा बाजार असेंही व्यवहारी माणसास वाटलें तर त्यांत काय चुकीचें आहे? आणि मलाही या गोष्टीची जाणीव नव्हती असें नव्हे. तथापि विशेष गुणांमुळें कांहीं व्यंगें जशीं लोपलीं जातात तद्वतच प्रस्तुत प्रकाशनासंबंधीं आहे असें प्रांजलपणें सांगण्यास मला मुळींच संकोच वाटत नाहीं.

माझे मित्र कवि श्री. पंडितराव सप्रे हे काव्यसंग्रहाचे लेखक या नात्यानें जरी आजच परिचित होत असले तरी त्यांच्या सुंदर काव्यांचा आस्वाद रसिक वाचकांनीं यापूर्वींच ज्ञानप्रकाश, सकाळ, सह्याद्रि, इत्यादि नियतकालिकांतून घेतला आहे. इतकेंच नव्हे तर प्रि. अत्रे, श्री. वि. स. खांडेकर, कवि गिरीश यांसारख्या थोर साहित्यिकांकडून मार्मिकता, कल्पकता, सूक्ष्म विनोद व उपरोध या त्यांच्या काव्यगुणांबद्दल अंतःकरण-पूर्वक प्रशंसोद्गारही निघाले आहेत. इतकें सांगितलें असतां हा 'अर्धचंद्र' 'प्रकाश मंडळा'च्या उगमस्थानीं युक्तच होय याबद्दल निराळी तरफदारी करावयास नकोच.

प्रस्तावनालेखक गु. पाठक हे किती मार्मिक टीकाकार आहेत हें त्यांनीं लिहिलेल्या प्रस्तुत पुस्तकाच्या सुंदर प्रस्तावनेवरूनही कळून येईल.

माझ्या प्रकाशनानुभवाचे बाबतींत मात्र मला इतक्या उच्च प्रकारचें पुष्टिपत्र नाहीं. आतांपर्यंत पुस्तकें छापविण्याबाबत व त्यांच्या प्रसाराबद्दल जरी मीं गेलीं चार वर्षें अनुभव घेतला असला तरी सुप्रसिद्ध लघुकथा-लेखक श्री. यशवंतराव जोशी यांनीं पुस्तक प्रकाशनास योग्य आहे असें

सांगण्यापासून तों तें प्रकाशित करतांना येणाऱ्या बारीकसारीक अडचणी दूर करण्यापर्यंत आपुलकीनें व थोर मनानें जी मदत केली; श्री. मामासाहेब दाते यांनीं व्यावहारिक अडचणींची झळ मला न पोंचूं देतांही उत्कृष्ट व झटपट छपाई करून देऊन जी सहानुभूति दाखविली आणि गु. पाठक यांनीं मार्मिक प्रस्तावना लिहून जें प्रेम व्यक्त केलें त्या सर्वांमुळेंच मी हें पुस्तक प्रकाशित करण्यास धजलों हें कृतज्ञतापूर्वक नमूद करणें मी माझें कर्तव्य समजतों.

त्याचप्रमाणें श्री. दादासाहेब कुलकर्णी व मि. रामभाऊ भोगे यांच्या हार्दिक सहानुभूतीबद्दल व वेळोवेळीं दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल मी सदैव ऋणी आहें.

अशा या काव्यकलापूर्ण संग्रहाचें, मराठी वाङमयप्रेमी रसिक योग्य तें चीज करतील व 'प्रकाश मंडळा'च्या पुढील कार्यास सक्रिय सहानुभूति दाखवतील अशी मी आशा बाळगतों.

पुणें :
२५–३–३८.

**दयार्णव कोपर्डेकर**

---

# प्रस्तावना

चिरंजीव पण्डित सप्रे यांनीं, लोकांना अर्धचन्द्र देण्याकरितां आपला हात उगारला, तों सान्निध्यामुळें मीच प्रथम सांपडलों, आणि एकदां त्यांच्या तडाख्यांत सांपडल्यावर कोण सुटणार? वास्तविक पाहतां रूढ-संकेत खणून काढण्याकरितां बद्धपरिकर झालेल्या पण्डित सप्रेसारख्या नववीरांनीं प्रस्तावनेचा उपचार पार झुगारून द्यावयास पाहिजे होता. एक तर रसिकांना त्यांची नवीन ओळख करून देण्याइतके ते अप्रसिद्ध नाहींत. 'अधिकस्य अधिकं फलम्' या व्यवहार-नीतीनें विचार केला तर, या कामीं त्यांनीं केलेली माझी योजना विपरीतच ठरेल. आपल्या अंगच्या अभिजात विनयामुळें ते स्वतःची योग्यता जाणीत नसतील हें मला मान्य आहे. दोन नकारांमुळें एक होकार होतो, या लहानपणीं माझ्याकडून शिकलेल्या भाषासिद्धांतामुळें त्यांची फसगत झाली असावी. पण दोन अप्रसिद्ध एक झाले म्हणून ते प्रसिद्धि कशी मिळविणार? आपल्या संस्कृतीच्या मुशींत ओतलेल्या त्यांच्या मनाला, कदाचित्, त्यांनींच एका कवितेंत म्हटल्याप्रमाणें 'गुरुजन दिसतां वंदन करणें' हें सहजप्राप्त कर्तव्य वाटलें असावें. बाकी एवढें खरें कीं, त्यांच्या काव्यांतील गूढार्थाच्या कोड्यापेक्षांही, प्रस्तावना-लेखक म्हणून माझी केलेली निवड अधिक कोडें उत्पन्न करते. माझ्यामुळें त्यांना यत्किंचितही लाभ होण्यासारखा नाहीं; पण 'पण्डित सप्रे यांच्या अर्धचन्द्राचे प्रस्तावक' म्हणून साहित्यक्षेत्रांत मला मात्र दीर्घायुषी होण्याचा योग दिसतो.

पदोपदीं सलणारा कांटा, जसा कुशल कारागीर बोल बोल म्हणतां काढून तळहातावर घेऊन दाखवितो, क्षणापूर्वी नको नको म्हणणारा भित्रा मालकही, तो तुळतुळीत तीक्ष्ण काळा कांटा पाहून कौतुकानें खुलतो, तसेंच, पण्डित सप्रे यांच्या या अर्धचन्द्राकडे लोक पाहतील. समाजाच्या पायांत बोचणारे कितीक कांटे काढून घेतलेले यांत सांपडतील. सिंहासारखा आपला समाज पण मर्मस्थानीं रुतलेल्या असंख्य शल्यांनीं तो अगदीं

हैराण झाला आहे. पण्डित सप्रेसारखे अंद्रोक्लीज हेच खरे समाज-सेवक होत. अन्नाविना तडफडणारा बुभुक्षित समाज वाटेल त्याची आहुति घेईल, पण अशा कवींच्या पायीं तो, कृतज्ञ लीनतेनें सदैव नम्रच राहील.

आमच्या टिळक हायस्कूल त्रैमासिकांत प्रसिद्ध करण्यासाठीं पण्डित सप्रे यांची कविता मीं जेव्हां प्रथम पाहिली तेव्हांच, हें पाणी कांहीं निराळें दिसतें, अशी खूणगांठ मनाशीं बांधली. त्यांची कविता पाहून कै. दिवाकर यांची मला आठवण होते. दोघांचीही दृष्टि सारखीच भेदक आणि काव्यां-गणांत प्रवेश करण्याचा दोघांचा मोहराही सारखाच दहशत उत्पन्न करणारा. मायावी जगानें पांघरलेलें सिंहाचें कातडें ओढून फाडून टाकण्यास दोघेही सारखेच उत्सुक. नाट्यछटाकार दिवाकर याच उद्योगांत अखेरपर्यंत गढून राहिले. जगाच्या ढोंगीपणाला विटलेलें त्यांचें मन असंतोषांतच विराम पावलें. पण्डित सप्रे यांच्यांत हा कडवटपणा जरी भरलेला दिसतो, तरी त्यांचें हृदय जगद्वेषानें पूर्ण पछाडलेलें दिसत नाहीं. या अर्धचन्द्राचा शेवट "विगतप्राण सारमेयास" या कवितेनें त्यांनीं केला आहे खरा, पण थोडें खोल पाहतां त्याच कवितेवरून सिंहाचें खोटें कातडें पांघरलेलें कुत्रें मेलें, आतां खरें तेजस्वी जग आपल्या स्वतःच्या स्वरूपांत चमकूं लागेल अशी आशा ध्वनित केलेली दिसेल. 'बाल सारमेयास', 'सागरगोटे' किंवा जगासंबंधींच्या तीन कविता यांमधून जगाच्या सांप्रतच्या स्वरूपाविषयीं त्यांना वाटत असलेली निराशा स्पष्ट दिसते. आपण या जगाचे रहिवाशी नसून, चुकलेल्या फकिरांप्रमाणें उपरे आहोंत, ही जडवादविरोधी कल्पना, जगावर मशिदीचें सुंदर रूपक करून त्यांनीं पुढें मांडली आहे. शहरांतील "संगीत शाळेंतून" ऐकूं येणाऱ्या कर्णकर्कश गोंगाटावरून, या जगाला संगीत समजणाऱ्यांची

**जुळतो न कुणाचा कुणास येथें सूर**

अशा वेंचक शब्दांनीं चांगलीच संभावना केली आहे. तरी पण त्यांचें अंतःकरण नैराश्यपूर्ण दिसत नाहीं. 'वळीव' व 'उल्का' या कवितांमध्यें हर्षभरानें उसळणारी त्यांची रंगेल भावमाधुरी वरील म्हणण्याची साक्ष देईल. सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या बाह्य स्वरूपाकडे पाहून

उत्पन्न झालेली चीड जगाच्या अंतर्यामीचें पावित्र्य व मांगल्य पाहून खचित नाहींशी होईल. "सांपडलेला आनंद" या कवितेंत जसे ते प्रथम फसून चिडतात पण पुढें सत्य प्रकार पाहून खुलतात तसाच जगाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोणही बदलेल, सृष्टिसुंदरीच्या कडेवर त्यांना जें आज भलतेंच ( किंवा भलत्याचेंच ) दिसत आहे, तें तसें खरोखर नाहीं असें आढळून येईल; व आपलेंच अपत्य तेथें प्रेमानें खेळत असलेलें पाहून त्यांचें कविमन संतुष्ट होईल असा भरंवसा वाटतो.

विश्वाच्या गहन स्वरूपाविषयीं ओझरतेपणें प्रदर्शित केलेले त्यांचे विचार एकाद्या द्रष्टयाच्या (prophet) तोंडीं शोभण्यासारखे आहेत. 'लपंडाव' कवितेंत केलेली हल्लींच्या नास्तिक जगाची मीमांसा मोठी काव्यपूर्ण आहे. मानवाला लपलेला देव जरी सांपडला नाहीं तरी, देवाला मानव सांपडला म्हणजे पुष्कळ झालें; नाहीं तर कायमचीच चुकामूक व्हावयाची. आर्त किंवा दुःखित यांच्याशीं सहानुभूति हें जें कविहृदयाचें एकमेव लक्षण, तें त्यांच्या 'एक पापी' या कवितेंत स्पष्ट दिसतें. प्रेमाविषयीं बोकाळलेल्या स्वैर व शिथिल कल्पनांची त्यांनीं केलेली थट्टा त्यांच्या वरवर दिसणाऱ्या प्रेमगीतांमधून सारखी वाहत आहे. प्रेमाचें पावित्र्य व एकनिष्ठता यांचें त्यांना किती महत्त्व वाटतें तें 'त्याचें हृदय' या कवितेवरून कळून येईल.

**ज्यांत कितीएक गोड पोरी आल्या नि गेल्या ।**
**तें हृदय कसलें—छेः असे धर्मशाळा !**

यापेक्षां जोरदारपणें मला वाटतें, कोणीही आपला आशय प्रदर्शित करूं शकणार नाहीं. मृत्यूनंतर होणाऱ्या जीवशिवाच्या ऐक्याचा पोकळ वेदांती सिद्धांत किती सहजपणें 'भग्नदीपां'त सुचविला आहे ! मला ती कविता वाचून शेलेच्या Adonais मधील Life is a many-coloured dome या पद्यपंक्तीचें स्मरण झालें.

सहज जातां जातां काव्यविषयक कांहीं वादग्रस्त मुद्दे सूचित करण्याची त्यांना हौस दिसते.

**असतेंच असें जर जग हें साधेंसुधें,**
**तर कशास कविता लागति करण्या बरें ?**

हैराण झाला आहे. पण्डित सप्रेसारखे अंद्रोक्लीज हेच खरे समाज-सेवक होत. अन्नाविना तडफडणारा बुभुक्षित समाज वाटेल त्याची आहुति घेईल, पण अशा कवींच्या पायीं तो, कृतज्ञ लीनतेनें सदैव नम्रच राहील.

आमच्या टिळक हायस्कूल त्रैमासिकांत प्रसिद्ध करण्यासाठीं पण्डित सप्रे यांची कविता मीं जेव्हां प्रथम पाहिली तेव्हांच, हें पाणी कांहीं निराळें दिसतें, अशी खूणगांठ मनाशीं बांधली. त्यांची कविता पाहून कै. दिवाकर यांची मला आठवण होते. दोघांचीही दृष्टि सारखीच भेदक आणि काव्यांगणांत प्रवेश करण्याचा दोघांचा मोहराही सारखाच दहशत उत्पन्न करणारा. मायावी जगानें पांघरलेलें सिंहाचें कातडें ओढून फाडून टाकण्यास दोघेही सारखेच उत्सुक. नाटयछटाकार दिवाकर याच उद्योगांत अखेरपर्यंत गढून राहिले. जगाच्या ढोंगीपणाला विटलेलें त्यांचें मन असंतोषांतच विराम पावलें. पण्डित सप्रे यांच्यांत हा कडवटपणा जरी भरलेला दिसतो, तरी त्यांचें हृदय जगद्द्वेषानें पूर्ण पछाडलेलें दिसत नाहीं. या अर्धचन्द्राचा शेवट "विगतप्राण सारमेयास" या कवितेनें त्यांनीं केला आहे खरा, पण थोडें खोल पाहतां त्याच कवितेवरून सिंहाचें खोटें कातडें पांघरलेलें कुत्रें मेलें, आतां खरें तेजस्वी जग आपल्या स्वतःच्या स्वरूपांत चमकूं लागेल अशी आशा ध्वनित केलेली दिसेल. 'बाल सारमेयास', 'सागरगोटे' किंवा जगासंबंधींच्या तीन कविता यांमधून जगाच्या सांप्रतच्या स्वरूपाविषयीं त्यांना वाटत असलेली निराशा स्पष्ट दिसते. आपण या जगाचे रहिवाशी नसून, चुकलेल्या फकिरांप्रमाणें उपरे आहोंत, ही जडवादविरोधी कल्पना, जगावर मशिदीचें सुंदर रूपक करून त्यांनीं पुढें मांडली आहे. शहरांतील "संगीत शाळेंतून" ऐकूं येणाऱ्या कर्णकर्कश गोंगाटावरून, या जगाला संगीत समजणाऱ्यांची

**जुळतो न कुणाचा कुणास येथें सूर**

अशा वेंचक शब्दांनीं चांगलीच संभावना केली आहे. तरी पण त्यांचें अंतःकरण नैराश्यपूर्ण दिसत नाहीं. 'वळीव' व 'उल्का' या कवितांमध्यें हर्षभरानें उसळणारी त्यांची रंगेल भावमाधुरी वरील म्हणण्याची साक्ष देईल. सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या बाह्य स्वरूपाकडे पाहून

उत्पन्न झालेली चीड जगाच्या अंतर्यामीचें पावित्र्य व मांगल्य पाहून खचित नाहींशी होईल. "सांपडलेला आनंद" या कवितेंत जसे ते प्रथम फसून चिडतात पण पुढें सत्य प्रकार पाहून खुलतात तसाच जगाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोणही बदलेल, सृष्टिसुंदरीच्या कडेवर त्यांना जें आज भलतेंच ( किंवा भलत्याचेंच ) दिसत आहे, तें तसें खरोखर नाहीं असें आढळून येईल; व आपलेंच अपत्य तेथें प्रेमानें खेळत असलेलें पाहून त्यांचें कविमन संतुष्ट होईल असा भरंवसा वाटतो.

विश्वाच्या गहन स्वरूपाविषयीं ओझरतेपणें प्रदर्शित केलेले त्यांचे विचार एकाद्या द्रष्टयाच्या (prophet) तोंडीं शोभण्यासारखे आहेत. 'लपंडाव' कवितेंत केलेली हल्लींच्या नास्तिक जगाची मीमांसा मोठी काव्यपूर्ण आहे. मानवाला लपलेला देव जरी सांपडला नाहीं तरी, देवाला मानव सांपडला म्हणजे पुष्कळ झालें; नाहीं तर कायमचीच चुकामूक व्हावयाची. आर्त किंवा दुःखित यांच्याशीं सहानुभूति हें जें कविहृदयाचें एकमेव लक्षण, तें त्यांच्या 'एक पापी' या कवितेंत स्पष्ट दिसतें. प्रेमाविषयीं बोकाळलेल्या स्वैर व शिथिल कल्पनांची त्यांनीं केलेली थट्टा त्यांच्या वरवर दिसणाऱ्या प्रेमगीतांमधून सारखी वाहत आहे. प्रेमाचें पावित्र्य व एकनिष्ठता यांचें त्यांना किती महत्त्व वाटतें तें 'त्याचें हृदय' या कवितेवरून कळून येईल.

**ज्यांत कितीएक गोड पोरी आल्या नि गेल्या।**
**तें हृदय कसलें—छेः असे धर्मशाळा!**

यापेक्षां जोरदारपणें मला वाटतें, कोणीही आपला आशय प्रदर्शित करूं शकणार नाहीं. मृत्यूनंतर होणाऱ्या जीवशिवाच्या ऐक्याचा पोकळ वेदांती सिद्धांत किती सहजपणें 'भग्नदीपां'त सुचविला आहे! मला ती कविता वाचून शेलेच्या Adonais मधील Life is a many-coloured dome या पद्यपंक्तीचें स्मरण झालें.

सहज जातां जातां काव्यविषयक कांहीं वादग्रस्त मुद्दे सूचित करण्याची त्यांना हौस दिसते.

**असतेंच असें जर जग हें साधेंसुधें,**
**तर कशास कविता लागति करण्या बरें?**

या ओळींवरून जगांत लफंगेपणामुळें जें दुःख माजलें आहे त्यामुळें कविहृदय पिळवटून जातें व त्यांतून काव्याचे तीव्र सूर निघतात, सर्वत्र जर आरामीआराम असता तर कवीची हृदयवीणा छेडली गेली नसती असें ते ध्वनित करतात. काव्यनिष्पत्तीविषयीं अशाच प्रकारची मीमांसा अनेक विद्वानांनीं केली आहे. देहभान विसरून जगाला मंत्रमूढ करणारे नितांतमधुर सूर, ज्यांत दुःखानें एकसारखीं घरें पाडिलीं आहेत, मनोभंग-परंपरेनें लचके तोडल्यामुळें जें भग्न झालें आहे अशाच कविहृदयांतून बाहेर पडतात. समाधानाच्या शीतलावस्थेंत जें मन गारगोटीप्रमाणें असतें त्यास दुःखाची प्रखर आंच लागल्यावर आंतील भावसुधा चुनकळीप्रमाणें उमलते. वज्रालाही वितळविणाऱ्या रसरशीत भट्टींतूनच स्वर्णमयी सरस्वतीची तेजःपुंज मूर्ति प्रगट होते. थोड्याशा धगीनें सामान्यजनांचीं मनें पाचोळ्या-प्रमाणें करपून जातात. पण थोरांचीं तावून सुलाखून निघतात. डांटे, कीट्स, शेले किंवा मॅक्सिम गॉर्की यांचीं उदाहरणें वरील सिद्धांताचीच सत्यता पटवतील.

शब्द, कंप, उष्णता, प्रकाश हीं जशीं निरनिराळीं विद्युत्स्वरूपें आहेत तसेच कोमल हृत्कंप किंवा कल्पनेची उंच भरारी हे काव्यशक्तीचेच आविष्कार होत. भावनेशिवाय काव्य म्हणजे जलहीन सरोवराप्रमाणें होय. पण्डित सप्रे यांची कविता, कल्पनेच्या पंखावरून गगनविहार करण्यास अधिक उत्सुक दिसते. पण हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, सहज लीलेनें स्वर्गारोहण करणाऱ्या त्यांच्या प्रतिभापुष्पकाला, जी प्रेरक शक्ति प्राप्त झाली आहे तिचा उगम, त्यांच्या हृदयांतील बाष्पीभूत भावबिंदूच्या वाफे-मधूनच झालेला आहे. पेट्रोलच्या थेंबापासून तात्काल ठिणगी कशी उत्पन्न होते हें ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना पण्डित सप्रे यांच्या कल्पनाशक्तीची यथार्थ जाणीव होईल. नाहीं तर भवशून्य कल्पनाविलास म्हणजे उडाण-टप्पूंचा रिकामटेकडा टारगटपणाच झाला असता. रुक्ष तर्कट कोणतेंही अंतःकरण रिझवूं शकणार नाहीं. पण्डित सप्रे यांच्या कल्पनेची फेंक भावसमुद्रांतून निघाली आहे हें विसरतां कामा नये.

क्षणाक्षणाला स्फोट पावणाऱ्या minute gun प्रमाणें उसळणाऱ्या कल्पनेच्या आवेगापुढें शब्द बिचारे दुमते तिमते झालेले त्यांच्या कवितेंत

दिसून येतात. पुष्कळ वेळां त्यांची भाषा इतकी ओघवती, अनुरूप व अन्वर्थक असते कीं, एकादा कानामात्राही बदलण्यानें अर्थहानि होईल.

“अन् भूतकाल ज्या दिशेस गेला तिकडे...
अन् म्हणे काळ हा पुढेंच धावत राहे.” ।

“रत्नराशी नव्हतीच त्या ठिकाणीं,
येई भंवती परि ‘सहारा’ दिसोनी.”

“मग हृदय तयानें आपुलें खुलें केलें,
तों जगास झालें विश्वरूपदर्शन.”

“एक सुधेचा बिंदु जिवाची शमवि जशी न तहान,
एकच आशा किरण न सारी अंतरिंचें तम दूर.”

“असतेंच असें जर जग हें साधें–सुधें–
तर कशास कविता लागति करण्या बरें”

इत्यादि ओळींवरून त्यांच्या भाषाशैलीची कल्पना येईल. परंतु त्यांनीं बरोबर शब्दयोजनेकडे थोडें दुर्लक्ष केलेलेंही कांहीं ठिकाणीं आढळेल. किंबहुना ओठावर येईल तो शब्द वेठीला धरण्याचा त्यांचा बाणा असावासें वाटतें. त्याचप्रमाणें मराठींतील कांहीं शाब्दिक म्हणींवरून द्व्यर्थी सुचलेल्या कल्पनांवर आधारलेली कविताही विशेष आकर्षक वाटत नाहीं. उदाहरणार्थ, ‘गुण उधळण्यावरून’ सुचलेली कविता, किंवा नापासांनीं खालीं राहणें, इत्यादि. मात्र कोणालाही न सुचणाऱ्या कल्पना प्रत्येकाच्या हरघडी मुखावर नाचणाऱ्या शब्दांवरून त्यांना कशा सुचतात हें आश्चर्य आहे. पण्डित सप्रे यांची कविता अत्यंत स्फुट स्वरूपाची असल्यामुळें तिला सुभाषितांचें स्वरूप येणारें आहे. त्यासाठीं शब्दयोजना अत्यंत मार्मिक व वेंचक होणें इष्ट आहे, म्हणून वरील वैगुण्याचा निर्देश केला.

पण्डित सप्रे यांची बिनचूक मर्मभेद करण्यांत दिसून येणारी हातोटी, अंतःकरणांत न खुपतां जाऊन भिनणारा त्यांचा उपरोध, सहजासहजीं कोणालाही फसवणारें त्यांचें गांभीर्य, आणि शेंकडों ओळींनीं जें कार्य होणार नाहीं, तें चारदोन ओळींत बेमालूम रीतीनें करण्याचें त्यांचें कौशल्य,

यांमुळें त्यांनीं आपली जागा, सरस्वतीच्या मंदिरांत, उच्च स्थानीं अगदीं स्वतंत्र अशी संपादन केली आहे. त्यांचा हा अर्धचन्द्र, हल्लीं काव्याकाशांत मिणमिणणाऱ्या पुष्कळ वाङ्मयग्रहांना अस्तंगत करील व आपलें पूर्ण तेज चोहोंकडे लौकरच फांकील असा मला विश्वास वाटतो. धोक्याचे प्रसंगीं अज्ञ बालकांना ज्याप्रमाणें त्यांच्या इच्छेउलट घालवून द्यावें लागतें, परंतु तेंच परिणामीं त्यांना हितकारक असतें, त्याचप्रमाणें पण्डितांचा हा अर्धचन्द्र समाजांतील अनेकांचे बाबतींत ठरेल. आशीर्वाद अगर शाप यांचा त्यांच्यावर सारखाच परिणाम होणार हें जाणूनही अर्धचन्द्रानें पाडलेली साहित्यांतरिक्षांतील प्रभा उत्तरोत्तर वृद्धिंगत होवो असा त्यांना आशीर्वाद देऊन ही प्रस्तावना संपवितों.

कऱ्हाड :<br>ता. १७–३–३८

द. पां. पाठक

---

# अर्धचंद्र

---

—A struggle for existence हें तत्त्व
जीवनाप्रमाणें साहित्याच्याही मुळाशीं आहे.
म्हणूनच प्रिय वाचक, हा " अर्धचंद्र "
आपल्याला द्यायचें कारण दुसरें तिसरें
कांहींच नसून जीवितासाठीं धडपड हेंच आहे !

—पण्डित सप्रे

—दार हृदयाचें खुलें जर करावें
उभें वाऱ्यासी कुणीही न राहे;
आणि लावुन दिनरात दार घ्यावें
तरी तेंही येतें न मन्मनासी !
—कसें हृदयानें जगीं या रहावें ?
प्रश्न ऐसा मम विकल करी जीवा !

८–७–३६ कऱ्हाड.

---

शनिवारवाड्यास—

सभोंवतालीं कितिदां तुझिया
वणवण फिरलों गणति न त्याला
स्फूर्ति परन्तू एकहि वेळा
आलि न कांहीं—करण्यास तुझ्यावर गाणीं !
फिरुनी फिरुनी हाय ! जिवाची
होउन जाते किती काहली !
विभवासम तव ममही जाई
वैभव दूर—जागेचा दिसतो गूण !
तुजसी बघतां सुचती गाणीं
किती कवींना वीररसाचीं
निजलेल्यांना उठवायाचीं !
परि हें मातें—सुचलें रे ! बघ रडगाणें !
किमर्थ रचलें मग हें गाणें
निरर्थ रसिकां त्रासविणारें
आणिक त्यांना नावडणारें
गाणें माझें—आनंद मला दे भारी !
देव दिसे कीं फूल वहाणें !
गुरुजन दिसतां वंदन करणें !
तुजसी बघतां गाणें करणें !
म्हणुनिच आहे—रचलें हें तुजवर गाणें !

२९–१०–२८ कऱ्हाड.

*शनिवारवाडा—

— आणि मोडक्या—
बाजारामधिं
कशास बसुनी
या जगतासी—
खुळ्या ! सांगसी
किंमत अपुली !

२९–१२–२८ पुणें.

---

गोविंदाग्रज—

भामिनी-समजुतीकरितां असे
पारिजातक तिच्या बगिच्यामधें.
पारिजातक फुले—पडती फुलें
येउनी सकलही सवती-घरीं !
— पारिजातक तसा वरती प्रभू
नेइ हास हंसुनि मनमोकळे !
त्याजला न कळले परि त्यांतले !
फूलझाड वरती—सुमनें इथें !

२२–२–२९ कऱ्हाड.

---

* मोडका बाजार शनिवारवाड्यापाशीं असतांना.

## दोन शिवाजी—

—आणि देवानें कौशल्य सर्व कांहीं
प्रकट करुनी शिवबास निर्मियेलें,
मानवानें त्यापरी सर्व काहीं
प्रकट केलें कौशल्य मूर्तिरूपें !
कसा होता : इतिहास दाखवी तें !
कसा आहे : तें कला दाखवीते !

८-११-२८ कऱ्हाड.

---

## उल्केस—

रम्य असा शशि आणि तारका यांचा सहवास
अहा मिळे जर होईल तर मग काय बरें मौज!
ते तुज सारे प्राप्त अहाहा ! जीवन धन्य तुझें!
धन्य तुझी ! तूं तरीहि येसी धरणीवरि खालीं.

१३-३-३१ कऱ्हाड.

---

## तरु आणि सरिता—

—दिसुनी यावी मूर्ति आपुली त्यास तियेच्या हृदयांत.
आणि रहावें डोलत त्यानें किति तरी वेळ तसेंच!
—आणि एकदां असाच असतां डोलत आनंदानें,
शेजारिल तों पडे उडूनी पाचोळा सरितेंत!

१५-५-३१.

---

## एक कल्पना —

चित्र तुझें मी रंगविण्याचा प्रयत्न करितों कधीं
तोंच मानवाकृती रहाते माझ्या नयनांपुढें !
आणि असा जर प्रयत्न केला पशुनीं कधिं काळीं—
तर मग त्यांचे पुढें कुणाचें राहिल चित्र उभें ?

२९–१०–२९ कऱ्हाड.

---

## देवांचें विमानावलोकन—

" धाडित होतों विमान आम्ही पृथ्वीवर खालीं
पुण्यवान जे असती त्यांना आणाया स्वर्गीं !
अशी संपदा कितीक आम्हीं लुटली आजवरी !
किती हिरे नी लाल आणुनी झालों श्रीमन्त !
[ अशा पचविल्या कितीक चोऱ्या आपण आजवरी !
कृतकर्माचीं फळें भोगणें ये आतां नशिबीं ! ]
—विमान मागें धाडित होतों पृथ्वीवर खालीं !
खालुनी येतें विमान आतां—कुणा परी न्याया ? "

१२–१२–२९ पुणें.

---

**विमान पाहून —**

आंत चालली मंगल दंगल कोठेंतरि आज
खेळत होता बाळहि मित्रासंगें बाहेर;
कोठुनिया तो नाद जाहला दिसतां, आकाशीं—
विमान, धांवत धांवत येई सांगाया आंत.
जिथें पितामह वाचत होते पुराण उघडूनि
जाउन तेथें म्हणे 'अजोबा,' विमान आलें हो ऽ!

१२-१२-२९ पुणें.

---

'Beauties From Kalidas' यांतील

**कालिदासाचें कुरूप चित्र पाहून—**

निर्मियली ही ज्यानें सुंदरशी काव्यसृष्टि तो हाच—
आहे, यावर माझा कांहीं केल्या बसे न विश्वास !
कारण सुंदरतेंतुन सुंदरता जन्म नित्य घेत असे
ऐसें वाटुनियां, मी मानुनियां तेंच सत्य चालतसें !
सत्य जरी मी मानीं येती तरि त्या अनेक अपवाद
कीं नच पाहियलें नच ऐकियलें ये फुलांतुनी फूल !
आतां मनांत घोळे : "निर्मियलें **विश्वकाव्य** हें ज्यानें
तोही काय तरी मग कुरुप असावा असाच जगदीश ?"

१५-२-३० पुणें.

---

विश्व—

कितितरी अहा हीं रत्नें वर आकाशीं !
हीं माणिक मोतीं खालीं सिंधुतळाशीं !
अन् मधेंच आम्ही रत्नें पण रत्नें रे !
रे ! माप असे हें कुणास फसवायासी !

१२–२–३० पुणें.

---

—व्यापुनि साऱ्या जगावरती दशांगुळें उरसी
असशी तर मग कसा न माझ्या सांग बरें हृदयीं ?
नवलच सारें ! राहुनि माझ्या रात्रंदिन हृदयीं
देखत तुझिया पाप घडावें हातुनिया माझ्या !
म्हणतिल कोणी " परतविलें तुज तेव्हां जगदीशें
परी न येउनि मागें—देसी उगाच दोष तया ";
आणि असा हा प्रयत्न केला असेल जर त्यानें,
तर मग देवाज्ञाहि मानवा भंगाया येते
आम्ही चुकतों परंतु ये ना चुकी सुधाराया,
किंवा येउन सुधारण्याचा करसि न तूं यत्न !
एक तुला तर पाप आवडे केलेलें आम्हीं
किंवा जावें अधोगतीला वाटतसे तुजसी !
कीं घडतें जें पाप म्हणोनी हातुनि कांहिंतरी
पाप नसावें तव दृष्टीनें जरि तें जग मानी!

३–५–३० कऱ्हाड.

---

## समुद्रमंथन—

लक्ष्मी कौस्तुभ पारिजातक अशीं रत्नें निघूं लागलीं
साक्षात् अमृत ये वरी तरि कुणीं नाहीं समाधानले !
लागे हाव सुटावया-हळहळू आलें अखेरी वरी—
चौदावें मग रत्न तें निघुनिया—तों सर्व थंडावलें !

१५–१२–३० पुणें.

---

## पुनर्जन्म—

विद्यार्थी असतां कळून चुकतें आहे पुनर्जन्म हें !
जेव्हां तो इतिहास-तास छळण्या जीवास या येतसे.
गेले हाय : कितीक वीर अपुल्या शत्रूस भंडावुनी!
गेले आणि कितीक वीर करुनी कामें भलीं थोरलीं!
सारे जन्मुनि ते पुनः पुनरपी मानेवरी बैसती ;
येतां तो इतिहास तास जगणें जातें नको होउनी

१०–२–२८ कऱ्हाड.

---

## सायंकाळ—

घरदार सोडुनी होइ रवी परदेशी !
—हें सारें केवळ—एक तिच्यास्तव सारें !
परि हाय ! तरीहि न !—अखेर तो अस्तावे !
—मग रजनी राणी हृदय खुलें करुं लागे !

२६–१–३१ पुणें.

---

## सायंकाळ—

नेसून गुलाबी पातळ नटली पूर्व !
अन् पहाती तिकडे गिरिं रविराज !
गेलाच तोल—तों येउनिया अंधारी—
लागले काजवे चमकावयास क्षणांत !

२–११–३१ कऱ्हाड.

---

## नवा पुतळा—

—तिथें बैसुनी त्याचेपाशीं केल्या किति गोष्टी
कंटाळा ये म्हणुनी गेलों फिरावया आम्ही ;
इच्छा माझी आतां तरि तो राहिल शांत जरा
परि तो कसला—तसाच राही बोलत कांहिं तरी !
विषय निघाला कोठुन कैसा आणिक तोच कसा—
कुणास ठाउक—! बोलत होतों जन्मावर पुढल्या !
एक दोन कां कैक दाखले देउनिया मजसी,
पटवुनि देई कधींच मागें सारे पटलेले !
—मान मोडतां दिसे लोचना अभिनव शिवपुतळा—
तोंच बोललों : “ नकोच देवा ! पुनर्जन्म ऐसा ! ”

३०–११–३१ पुणें.

---

## गैरसमज—

तूं होतीस अशीच येत इकडे माझ्याकडे प्रेमळे,
मीही येत पुढून तोंच वळसा घेऊन मित्रासवें ;
आलों मी कितिदां असाच तरी हें सारे असें शून्यसे.
होतें अंबर हेंच हे न वरती चंद्रावती आढळे !
जातांना जवळून गोड तुझिया गालावरी ये हंसें
ज्यासाठीं कितिदां तरी नवस मी बोलूनि गेलों असे
देवी! आज उषा अशी उगवतां तूझ्या कपोलावरी
आशा तोंच पहा कशी बिलगली येवोनिया अंतरीं !
तूं गेलीस निघून—पाहुन मला सांगे सखा हासुनी
" मित्रा रे हंसली कशी मधुर ती आहा मला पाहुनी ! "

९-८-३१ पुणें.

---

## त्याचें हृदय—

—आणि म्हटलें, " राहील ही सुखानें. "
परी माझें दुर्दैव, ती न राहे !
अशा आल्या कितिएक गोड पोरी
आणि गेल्या हृदयांतुनी निघूनी !
हृदय कसलें—छे: असे धर्मशाळा !
तिथें कायम राहे न कुणी बाला !

१-१२-३३ पुणें.

---

## फोल आशा—

मासिकाचे त्या पहा अंक सारे
आणि पहिलीं चाळून पहा पानें
दिसुन येतिल मग तिथें कितिक गाणीं
आणि खालीं सहि " कुमारी किशोरी !"
रोज संपादक गाइ तिची कीर्ती,
म्हणे : " ऐशी कवयित्रि जगीं नाहीं !
हीच अटकेच्या पार काव्यझेंडा
भारतीं या लावील नेउनीयां "
—एक दिवशीं मग पहातां टपाल,
येइ कसलेंसें दिसुनि तया पत्र :
अधिर होउनि वाचलें पत्र त्यानें
तोंच गेलें तद्‌हृदय विदारूनी !
वदे दुक्खानें," हा हाय ! काय झालें !
श्रेय अपुलें हें दुजासी मिळालें !
अशी आशा होतांच फोल त्याची
मिळे संजीवन आसुरि भावनेसी !
तिला पहिलें दिधलें न पुनः पान !
आणि कीर्ती पुनरपि गाइली न !

४–९–३३ पुणें.

### उत्क्रांति—

—धावतें सदा जग प्रगतीमागोमाग
तर मींहि कसें मग स्वस्थ रहावें सांग ?
उत्क्रांति जगासह होत असे बघ माझी :
—रे ! निराकार निर्गूण दिसंदिस होई !

२०-११-३१ पुणें.

---

### ईश्वर आणि मी —

—पहावया नच येई : परि तो पाहतसे सारें !
न ये ओळखावया : तरी तो ओळखतों सारें !
—तूं न पहासी, सखे ! परि मी तुजसी अवलोकीं
तूं न जाणसी : परंतु सारें माहित मजलागीं

३१-३-३२ पुणें.

---

—तुजविषयीं करितां विचार, कळलें मजसी :
" नाहींच तुला रे ! आदि आणखी अन्त !
म्हणजेच एक तूं पुस्तक जीर्ण विशाल :
नाहींत जया पहिलीं नि कडेचीं पानें !"

२-४-३२ कऱ्हाड.

---

## विद्यालयाचा निरोप घेतांना—

येई न जगीं या घेउनियां कुणि कांहीं !
जाई न घेउनि कांहीं कुणी परलोकीं !
—तैसाच जातसे निरोप घेउनिया मी
संगें न शिदोरी परन्तु घेउनि कांहीं !

२५–५–३२ कऱ्हाड.

---

## नापास झाल्यावर—

—राहसी एकला तूंच अखेरी खालीं
कां खंत मना रे ! त्यास्तव वाटुन घेसी ?
हा न्यायच बघ की शंख नि शिंपा वरती
अन् माणिक-मोतीं खालीं सिंधु-तळाशीं !

६–१२–३२ पुणें.

---

## एक देवभक्त —

" करि प्रेम तिच्यावर—" ऐकुन करि उपदेश :
" सोडुन नाद हा, धरी प्रभूची कास ! "
मी म्हणे, " प्रभूचे आपण सारे अंश !
म्हणजेच भजे मी पर्यायें जगदीश ! "

१०–७–३२ पुणें.

---

## समाधान —

" They also serve who only stand and wait "

—*Milton*

मनांत येई एक तरी कप
द्यावा तुजसी चहा
परि चहाचें दुकान तर तें
तुझ्याच दारामधीं !
गात बसावें गीत तुझें तर
तुझ्याच वाड्यामधीं
गाण्याची लयलूट सारखी
गायन क्लास करी !
वाटतसे कीं कवन रचावें
तुजवर तर हें पहा
जीव टाकिती पाहुन तुजसी
कितीक रोज कवी !
काय करूं तरि सुचे न कांहीं
वाटतसे आतां
स्वस्थ राहुनि तुजसाठीं तरि
काय न ये करितां ?

२६–६–३२ पुणें.

## निराशा —

—पाहिलें तुला तें मागुनिया मी सारें
परि दिलें त्यांतलें कांहिं न तूं मजलागी !
मग ही तरि आतां देउन मजसि निराशा
करितोस कशास्तव सांग बरें उपकार ?

१९-८-३२ पुणें.

---

—जायास निघावें आपण फिरण्यासाठीं
तों मागुनि यावा कानावरती नाद !
म्हणुनिया आपुलें सहज पहावें मागें
तों येत असावी मागुन कचरा-गाडी !

२०-९-३२ पुणें.

---

"Not failure but low aim is crime"—*Browning*.

पेला मधुर चहाचा हातीं
आहे सत्य जसें हें बाई !
तितकेंच सत्य कीं तुजवरती मम प्रीती !
देती दोष किती यासाठीं—
कीं: "योग्य न मी तुजलागी !"
तरि समाधान कीं तुजवरती मम प्रीती !
येई अपयश जरि मजलागीं
तरि खंत न त्यामधिं कांहीं
ठेविलें ध्येय मीं थोर किती मजपुढती !

२२-८-३२ पुणें.

---

पाखरास—

हे पाखरा असा तूं
येसी कशास खालीं?
सोडून मोह सारे-
घेई वरी भरारी!

अभ्यास ना जरी हा
तरि खालती रहावें।
हे कायदे जिवासी
करतात रे नकोसें!

पैक्याविना चहाही
देण्या कुणी न राजी
मग सांग या ठिकाणीं
जगण्यांत काय आहे?

लागे नवा सिनेमा
राहे करीं न पैसा!
परि हाय! रे! सुबुद्धी
कोणासही न होई!

साधी सहानुभुती
दावी न येथ कोणी!
मग पाखरा कशासी
यावें उगाच खालीं?

१-१०-३२ पुणें.

---

## काळ आणि ताजमहाल—

प्रिय शहांजहांसी प्राणाहुन जे भारी—
हृत्कौस्तुभ–तें–मुम्ताज–हिरावुन नेसी !
केलेंस कृत्य जें अघोर !–काळ! तयाचा—
हा असा घेतला न कळत सूड तयानें !

२८–१०–३२ कऱ्हाड.

---

## रजनी—

श्रम फार जहाले पाय न कांहीं हाले
पसरून दिले हलकेंच तदा ‘ दिवसानें !’
लागले दिसाया तयास मग स्वप्नांत :
“ ती रजनी–राणी–संगें चंद्र नि तारे !”

३१–१०–३५ कऱ्हाड.

---

## जग—

बाजूस दिसे तें ग्रंथालय की जेथें
मिळतें न हवें तें पुस्तक–त्यापरि सारें–
हें असें पहा जग–जेथें एकहि कांहीं
जीवास हवें तें मिळे न हाय कधींही!

२–८–३३ पुणें.

---

[विलकॉक्सच्या True Charity चें विडंबन]

**उपकार—**

—उभा होतों दारांत सुप्रभातीं
तोंच येई कुणि मजकडे भिकारी !
चामचंची काढून खिशांतूनी
एक नाणें काढून दिलें त्यासी !

दिनीं दुसऱ्या पुनरपी तेंच होई
तोंच येई घरिं माझिया भिकारी !
काय द्यावें मज सुचेनाच कांहीं !
म्हणुनि दिधले मम काव्यग्रंथ त्यासी

पुन्हा आला नाहींच तो कधींही !
कुठें गेला—आलें न तें कळूनी !

१६–२–३३ पुणें.

---

**सायंकाळ—**

—रवि उदयानंतर मावळतीला निघे
परि दिसून ये ना लालपणा तिळ कमी !
वर्गांत जसे कीं येतां जातां पहा
संतप्त आपुले असती गुरु नेहमीं !

४–४–३३ कऱ्हाड.

---

## नुकत्याच विगतप्राण झालेल्या बाल सारमेयास—

— आयुष्य जगांतिल सुंदरसें हें किती–
परि महक सारी माया !–जणुं टाकिले–
दाणेच पाखरूं धरण्या जाळ्यामधीं !
तूं सुज्ञ खरा तुज कळली सारी कृती
गेलास सोडुनी जग तूं स्वर्गामधीं !

४–४–३३ कऱ्हाड.

---

## मनोरे—

—चालून जरासें जातां अंतर कांहीं
लागले दिसाया सुंदर दोन मनोरे !
वाटलें : " बाळ की हात आपुले वरती–
करुनिया म्हणे घे प्रभू कडेवर मजसी ! "

६–४–३३ कऱ्हाड.

---

—मग हृदय तयानें केलें अपुलें खुलें
तों जगास झालें विश्वरूपदर्शन !

१८–१–३४ पुणें.

---

## " रे " मार्केटवरील घड्याळ—

जगांत असुनी तूं न चालसी कधीं जगासंगें
पटे जगासह तुझें न ऐसें आजवरी झालें;
प्रभात झाली जरी जगाची तरी न होत तुझी
असति तदा तूं गोड गुलाबी पहात मधुस्वप्नें !

वर्तमानकालांत विश्व हें करतें संचार
त्या समयीं गतकाळ राहतो नाचत तुजभवती !
आणि कधीं तर दौडत जासी इतुका तूं वेगें
प्रगति तुझी ती पाहुनिया जग करितें आश्चर्य !

१०–४–३३ कऱ्हाड.

---

## जग—

" हें काय बरें– " तो पुसतां सांगितलें कीं :
" ही मशीद रे ! जन देति जिला ' जग ' संज्ञा !
वर निळा निळा हा घुमट भव्य दिसताहे !
चुकलेले खालीं फकीर आपण सारे ! "

२४–४–३३ कऱ्हाड.

---

ती : जाहली ना रात्र भारी येउनिया अंबरीं
तोंच प्यारी तारका कां जाइ सोडूनी शशी ?
तो : " त्याग प्रीतीची कसोटी "–तत्त्व सारें जाणुनी
काय वेडे प्रश्न ऐसा तूं करावा ना कळे !

१५–६–३३ पुणें.

---

## गीतारहस्य आणि ज्ञानकोश--

—त्या मेजावरती सुरक्षित पहा मोठयांत मोठीं अशीं
हीं तीं दोन बुकें न ताप कसला देती कधींही मला !
" वाचीं तीं " म्हणुनी कुणीहि मजला आज्ञा न केव्हां करी !
नाहीं वाचियलीं म्हणून मजला शिक्षा न कोणी करी !

२४–६–३३ पुणें.

---

## न कळत—

—जसी निघे भरधांव पुढें चौचाकी मार्गांतुनी
आणि धावुनी मागें तिचिया न कळत चढती मुलें;
तसेंच बसतां न कळत माझें प्रेम तुझ्यावरती–
' पीछे चाबुक ' म्हणुनि इशारा मैत्रिण तुज देई !

१–५–३३ कऱ्हाड.

---

**शकार—**

—म्हणतात गुणावर प्रीती जडते जगीं
विपरीत परंतू दिसतें मज सर्वही !
उधळून टाकितां येतिल ऐसे किती
गुण होते तरिही प्रीति न त्या लाधली !

२८-१०-३१ कऱ्हाड.

---

**तूं आणि म्यु. दिवा—**

—दिवा रस्त्यांतला जैसा
तसा आहे तुझा प्रेमा !
न दावी मार्ग पांथस्था !
न होई साह्य वा त्याला !

२५-३-३३ पुणें.

---

**प्रीति—**

सख्या रे ! प्रीतिचा सौदा तुला का वाटला सोपा ?
चहा कीं गोडसा जैसा कुणींही घेउनी प्यावा ?
कुणीही गात बैसावी अशी का प्रीत ही सोपी ?
न तैशी प्रीत ही सोपी लिपी ती फारसी उलटी !

२५-३-३३ पुणें.

---

चळीव—

वसंतविभवें नटली होती सुंदर वसुधा राणी
बघुनि कुणी हें हळूच मारी तिजसी पिचकारी !

१७–८–३३ पुणें.

---

उल्का—

—आणि वसुमति जात न्हाउनी शांत चंद्रिकेमाजीं
तों कुंजांतुन हळूच मारी खडे कुणी तिजसी !

१७–८–३३ पुणें.

---

सागरगोटे—

टाकसी खडे– [ येतात जगीं या प्राणी ! ]
झेलून घेसि– [ जातात वरी निजधामीं ! ]
ना काम न धंदा कांहिं तुला म्हणुनीया
तूं अशी सारखी खेळसि सागरगोटे !

७–७–३३ पुणें.

---

## विचित्र छत्री—

– बालगीत –

छत्री आभाळाची ही
घेत फिरे वसुधा राणी !
तापे रवि वरती जेव्हां
जाते तापुनिया काया !

येतां झिम्झिम् पाऊस ती
चिंबच होउनिया जाई !
असली कसली ही छत्री ?
येइ न कांहीं उपयोगी !

५–९–३३ पुणें.

---

दावितां वाचुनी गीत तुला फुलराणी
मीं म्हटलें कळलें नाहिंच कां तुज कांहीं ?
"छे : तसें न"–म्हणसी "कळतें सारें कांहीं"
—मग कसें सखे तुज प्रेम न कळलें माझें ?

५–२–३३ पुणें.

---

## सहारा—

आणि जातांना पाहिलें रवीनें
तोंच रत्नाकर एक ये दिसोनी !
तिथें भारी आहेत कैक रत्नें
अशी होती ऐकली कीर्ति त्यानें !
काय मिळतें तरि बघूं या—' म्हणूनी
तयें अपुलें सामर्थ्य खर्च केलें !
—पुढें गेलीं लोटून कैक वर्षें
आणि त्यानें पाहिलें काय झालें ;
रत्नराशी नव्हतीच त्या ठिकाणीं !
येइ भंवतीं परि सहारा दिसोनी !

२४–९–३३ पुणें.

---

—आहे काय सखे ! नशिबांत् ?
येउन दारीं पाहुन जाशी आंत
उगीच कशास् ?
क्षण तूं चमकुनि लपशी बिजली
पसरशि पथिं काळोख !
एक सुधेचा बिंदु जिवाची
शमवि जशी न तहान्
एकच आशा किरण न सारी
अंतरिंचें तम दूर ?

२७–१–३५ पुणें.

---

—कडाक्याचें हें ऊन भोंवतालीं
तरी राहे कुंभांत गार पाणी.
परिस्थितिची धग जाणवे तरीही
हृदय थंड माझें हें राहताहे !

७-३-३६ पुणें.

---

**श्री. वा. मा. पाठक** एम्. ए.—

किति रम्य उतरली आहे संध्याकाळ !

**श्री. पु. वि. करंदीकर** बी. ए. --

अन् भटकत आहों आम्ही रानोमाळ !

**Myself**—

परि थेंब चहाचा हाय ! न देई कोणी !

**Chorus**—

मार्गांत त्यापरी दिसे कुणी न किशोरी !

१९-१-३४ पुणें.

---

**कॉम्रेडचें प्रेमगीत**—

—" आहेस तूं माझी "—वाटतें जरी
तरी कसें तसें बोलून दावूं ?
हक्क समाजाचा सारून दूर
अपराध कसा करूं मी घोर ?

७-२-३६ पुणें.

---

## एक पापी—

देव :— " पापकृत्यें सोडून सकल देई
खुला म्हणजे होईल तुला स्वर्ग "

पापी :—" खरें सारें—हातचें सर्व आधीं
सोडुनी कां धरूं हाव दूरची मी ?
इथें जैसें सुख भोगणें मजेनें
तसें कायम मिळणार सौख्य तेथें !
घास मुखिचा मम आज काढुनीया
दु:खपंकीं ढकलसी तूं कशाला ?
सुखापासुनि मज दूर नेउनीया
धनी पापाचा होसि तूं कशाला ?
असा राहुनि राहुनी दूर देवा !
मानवांना बघतोस तूं कशाला ?
जवळ येउनि हृदयांत जरा राही
आणि सारें बघ नीट न्यहाळूनी !
कळुनि येइल मग तुला सर्व कांहीं
आणि करशिल तूं क्षमाही अखेरी !

२१–३–३४ पुणें.

---

क्रांति—

—मनोराज्यांत गे होऊन क्रांती
गेलें हादरून आसन तूझें !
सत्ता निरंकुश लोपून तुझी
'लोकशाही' तेथ जहाली दृढ !

७–२–३६ पुणे.

---

—नव नव तारे सारे शोधण्यांत
मति मानवाची जाई गढून !
—आश्चर्यच मज वाटें देखून !
तारा नभांतील निखळल्या ज्या
कसा कुणी त्यांचा लावी न शोध ?

३१–३–३६ पुणें.

---

## सप्रेम भेट

—त्या दोघींसहि मीं पुस्तक दिधलें भेट
तो प्रसंग कधिं ना जाइल स्मरणांतून !
मीं म्हटलें, "सखया ! सारें छान परन्तू
पाहुणा उपाशी दो घरचा न रहावा !"

१३–३–३६ पुणें.

---

कल्पक—

—शेकडो युवक परि एकासहि कल्पना
सुचली न तुझ्यावर प्रेम करावी अशी !
राहिलें तयास्तव कौतुक माझें, परी
जातेस उलट तूं रागवुनी कां गडे ?

२७–६–३६ कऱ्हाड.

---

सारमेयाप्रत कवि —

—गळपट्टीवाचुन फिरशिल जर जगतांत
राहतील कां तव जाग्यावरती प्राण ?
कंठांत प्रियेचा नसेल जर करपाश
माझेहि तुझ्यापरि खाइल ना कुणि हाल !

६–७–३६ कऱ्हाड.

---

जातीच्या सुंदरींना—

ती म्हणे, " तुम्ही मुळि शोभत नाहीं मला,
यापरी आपली चेष्टा होते जगीं ! "
मी म्हणे, " लक्ष्य का देसी तिकडे वृथा ?
जे सुंदर त्यांना कांहींही शोभतें ! "

१०–५–३७ कऱ्हाड.

---

समस्यापूर्ति—

—प्रीतीस आमुच्या हातुन हो आरंभ
परि जमे न आम्हा प्रगति कांहींच त्यांत !
तों साधी कुणितरि दुजाच शेवट गोड !
—यापरी समस्यापूर्ति प्रीतिची होई !

३१–१२–३७ कऱ्हाड.

---

एक रिक्रूट—

—आज झाल्यावर म्हणे तो परेड,
" काय इथले हे लोक बेंगरूळ !
जुळत माझ्याशीं पाय ना कुणाचे !
लेफ्ट् राइटही सरळ ये न कोणा ! "
'कोण–' म्हणुनी वर सहज पाहिलें तों
दिसून आला मज एक कॉमरेड !

२२–१२–३६ कऱ्हाड.

---

नुकत्याच विगतप्राण झालेल्या बाल सारमेयास पाहून—

क्षणभर त्यानें
जगाकडे या
दृष्टि फेकिली;
आणि आपुली
दिली टाकुनी
मान धरेवरी !

२–१–३४ कऱ्हाड.

---

### अवेळीं भुंकतांना—

गळा काढुनी भेसुर असला
कां रे जगता शिणविसि ऐसा ?
कृती तुझी ही अशी अकारण
सक्तीनें जगतास जागवी !
जणुं तूं म्हणसी; "व्यर्थ झोपुनी
कालव्यय तूं करसि मानवा ?"
कळे तुझा संदेश परंतू
भुकसि असा कां वेळिं अवेळीं ?
—कळेल तें जर–तर जगतांतिल
व्यक्त कितीतरि होतिल गूढें !

२–१–३४ कऱ्हाड.

---

### त्रिशंकू—

—स्वर्गीं न वरी, खालीं न तसे पाताळीं
म्हणजेच त्रिशंकूपरी धरेवर आम्ही !

१८–१–३४ पुणें.

---

### जग—

—पलिकडे कुणीतरि घालून संगितशाळा
पटवून देइ कीं "जग हें संगित सारें !"
खोटें न, त्यांत किती आढळुनी ये सत्य !
जुळतो न कुणाचा कुणास येथें सूर !

२०–२–३४ पुणें.

---

—तुझा घेवोनिया, आधार हे जाती
भवसिंधुपार व्हावयासी !
घेवोनी भोपळे तरती हे सारे
आणि जग त्यांना नांवाजतें !

१०–२–३४ पुणें.

---

## एक स्टेशन—

—मेल येई फुंकून शिटी जाई;
आणि तैशी एक्स्प्रेस निघुन जाई;
परी पॅसिंजर आणि मालगाडी
तिथें नेमानें उभी राहताहे !

८–३–३४ पुणें.

---

## लपंडाव—

—मग सहज मजेनें देव जगाला वदे,
"या चला लपाछपि आपण खेळूं जरा."
तों राज्य जगावर आलें, लपला प्रभू !
अन् तेव्हांपासुन जग हें शोधी तया !

३०–४–३४ पुणें.

---

—गंधर्वगायन रमवितें मन
देवा ! तुझें नित्य स्वर्गलोकीं !
कैसे माझे मग, कर्कश आलाप
तुझें समाधान, करतील ?
जरी होवो नच, तुझें समाधान
लक्ष्य तुझें परि वेधेल ना ?

११–४–३४ पुणें.

---

— किती होतें मज तदा जावयाचें
परी नव्हता पायांत जोर कांहीं !
आज आतां जाईन जर कुठेंही
कुठें जावें तें कळेनाच कांहीं !

१–५–३४ विटें.

---

**पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भावि काल !—**

—उत्क्रांत जाहलों वानरजातींतुनी
इतिहास आमुचा दिव्य असे यापरी !
मग भावि काळ तो रम्य असे कोणता
ठेविला आमुच्यापुढें न कांहीं कळे !

१३–७–३४ पुणें.

---

—मग गाल आपुला करुनी माझ्यापुढें
" घ्या पापा माझा गोड " म्हणाली शशी !
ठेवितां ओठ मग गालावर, वाटलें :
" असतेंच असें जर जग हें साधें सुधें—
तर कशास कविता लागति करण्या बरें ?"

१४–१०–३४ कऱ्हाड.

---

## दिव्याखालीं अंधार—

—प्रकाशे अंतरीं माझ्या, सखे हा दीप प्रीतीचा
परी अंधार गे ! सारा तुझीया अंतरामाजी !

६–१–३५ कऱ्हाड.

---

—तो म्हणे : " तुझा रे ! हात जरासा बघूं
ऐश्वर्य, भाग्य, धन किती नशीबीं तुझ्या ? "
मी म्हणे : " हात मम कशास तूं पाहसी ?
बघ हात तिचा मद्भविष्य हातीं तिच्या ! "

२०–१–३५ पुणें.

---

## उल्का—

—त्या स्वर्गांतिल तारा, येती खालीं धरेवरी जेव्हां
तेव्हां रूप तयांचें पालटुनी होति त्या शिलाराशी !
—देवा त्याचपरी तूं येशी खालीं धरेवरी जेव्हां
तेव्हां पालटुनी तव रूप, तुला येतसे शिलारूप !

२८–१–३५ पुणें.

---

—येतेस सखे ! तूं सदैव माझे मनीं !
येतेस आणि रति होउन स्वप्नामधीं !
तैसीच माझिया येशी काव्यांतही !
— मग येसि न कां सति होऊन माझ्या गृहीं !

११–२–३५ पुणें.

---

## एक आशा—

—एकदां तुझ्या हृदयीं मीं राज्य चालवीलें
परी आज नांवहि माझें राहिलें न बाले !
नसे ना, नसो ! इतिहासीं उद्यां नांव माझें
मूळपुरुष साम्राज्याचा म्हणुन व्हायचें गे !

१९–६–३५ पुणें.

---

## दोन लेखकांची एक इच्छा—

—दोघांनीं आपण लिहिल्या गोष्टी छान !
परि कशी जहाली जम्मत एक तयांत !
नायिका आपुल्या एकच—नांवहि एक !
—ऐसें न पुढें कधिं होवो आयुष्यांत !

८–८–३५ पुणें.

---

## आजोबा !—

—पाळण्यांत जैसें स्वस्थ पडूनी बाळ
कांहींतरि हातीं धरुनी चोखित राही !
तैसेच अजोबा खुर्चीवर आरामी
बसतात घेउनी "सकाळ" चाळित नित्य !

२–१०–३५ पुणें.

---

## शाळेंत आल्यावर—

—रे ! नाहिं तरी मी तसा हुषारच फार !
परि आलों येथें चुकलें तेंच जरासें !
ज्यापरी नभांतिल तारा धरणीवरती
येतांच तयाचें लोपुन जातें तेज !

१५–५–३५ कऱ्हाड.

---

शोभनेप्रत सद्राय—

—मग एकामागुन एक असे सुंदर
काव्याचे माझे संग्रह येतिल पुढें !
जग करिल त्यांचें स्वागत गे ! हार्दिक
पत्रांचे भरतिल आणि रकाने किती !
—येतांच पुढें कविसंमेलन शोभने !
अध्यक्ष तिथें का मजविण दुसरा दिसे ?
येईल तुला मग कळुनी मम लायकी !
परि उगाच दावूं कशास तें बोलुनी ?
—जातील साठ मम वयास वर्षें जधीं
नाचेल तदा जग घेउन मजला शिरीं !
जें भाग्य न लाधे नृपासही, तें मला—
पाहतां मती तव होईल गे ! कुंठित !
—मग अखेर गाणीं एक दिनीं आपुलीं—
गे ! गात गात जाईन धरा सोडुनी !
हळहळेल सारें जग हें माझ्यास्तव !
देतील तिलांजलि रसिकहि लक्षावधी !
—प्रतिवार्षिक नंतर गांवागांवांतुनी
होतील सुरू मम उत्सव शोभावती !
नामांकित वक्ते गातिल माझी स्तुती
येईल तुझ्या तें सारे कानावरी !
— निश्वास तदा तूं बसशिल गे ! टाकित !
म्हणशील आणि : “ कशि चूक अशी जाहली ! ”

४–१–३५ कऱ्हाड.

साऱ्याही विषयांत—

हातीं पुस्तक घेउनी सहज मी खोलींत दारांतल्या
होतों वाट तुझी पहात कधिं तूं येशील माझ्या घरीं !
[ झाली आज मजाच और ! मजला ती सारखी आठवे
साऱ्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे ! ]
होता वाळत घालण्यांत कपडे दारीं कुणी गुंतला
तेव्हां आलिस तूं—किती किति मला आराम गे वाटला !
वाटे गंमत की अकल्पिक असा हा योग आला कसा
अंतर्पाट नि हा मधेंच बनुनी दोघांमधें राहिला !
—येतें पाहुनिया मनांत अपुले हें संपले दुर्दिन !
सौख्याचीं दिसती म्हणून सगळीं हीं गोडशीं सूचितें !

५–१–३४ कऱ्हाड.

---

आमचीं स्मारकें !—

—आणि मित्रासमवेत जिथें आम्हीं
पुलावरती बैसून मजा केली !
त्याच जागेवर पहा आज कांहीं
गोड पोरी बसतात हवा खात !

—आणि त्यांना बघतांच तिथें सारे
दिवस पूर्वीचे स्मरतात ते मजेचे !
काव्यमय ह्या रमणीय स्मारकांसी
बघुन होतो आनंद किति जिवासी !

१५–२–३४ पुणें.

---

## कवितेचें देणें—

कवितेनें माझ्या मला
    कीर्ती, रसिक, हें दिलें !
आणि मजेदार तिची
    जोड करूनिया दिली !

परी प्रेमळ हे मज
    लाभले जे मायबाप
ते न कवितांच्यामुळें
    अभाग्यासि या लाभले !

मग दिलें तरी काय
    सांग कवितेनें मज ?
––परि कवितांनीं माझ्या
    भाग्यवंत होसी बाळा !

दिले मायबाप तुला
    गोड कवितांनीं माझ्या !
परी तुला काय त्यांचें
    सांगुनिया कळायाचें ?

२४–१–३५ पुणें.

---

—तो हाच तुझा आवडता पण्डित सप्रे
खोलींत बसूनी करितो काव्य बिचारा !

—जो धुंद मनोराज्यि न दे लक्ष्य सभोतीं
अन् खात सुपारी बसतो पाहत तूतें !
तोच हा तुझा.... .... .... !

—मेजावर आहेत जरी ग्रंथ परन्तू
डोक्यांत न राही लवही ज्ञान जयाच्या !
तो हाच तुझा.... .... .... !

—आयुष्य तुझ्यावीण सहारा कळुनीही
येई न करायास परी व्यक्त जयासी !
तो हाच तुझा.... .... .... !

—चित्तांत तुझी मूर्ति नि डोक्यावर टोपी
ना ध्येय फिरायांत जया गंमत भारी !
तो हाय ! तुझा आवडता पण्डित सप्रे
खोलींत बसूनी करितो काव्य बिचारा !

७–१०–३४ कऱ्हाड.

---

## नवी दृष्टि—

—आणि झालिस शब्दास तूं महाग
म्हणुनि दिधला दैवास किती दोष !
परी माझे उघडले आज डोळे
आणि चुकतें तें कळुनि सर्व आलें !
—बैल जैसा घाण्यास जुंपलेला
तुझ्याभवती मी तसा गे ! फिरावा !
यांत होता अनंद जो अपार
आज गेला–जाहलें फार छान !
—दृष्टि मागें खिळवून एक जागीं
घेत होतों नुकसान मी करूनी !
दृष्टि माझी होऊन तदा मंद
सदा वाटे जग असे हें भिकार !
—आज व्यापक होऊन दृष्टि वाटे
दिसे तैसें जग नसे हें भिकार !
इथें रत्नें आहेत कैक भारी !
आणि कंजुष तुजपरी जग नसे हें !

९–५–३४ कऱ्हाड.

---

## कालगीत —

—अन् भूतकाळ ज्या दिशेस गेला तिकडे
हा पहा चालला वर्तमान,–तों मागे
ये दुरुनी त्याना भविष्य अनुसरण्यातें !
—तरि म्हणति काळ हा पुढेंच धावत राहे !

९–८–३३ पुणें.

---

**कोलंबस —**

—सोन्याचा निघतो धूर तिथें नेहमीं
रस्त्यावर दिसती पाचु हिरे माणिकें !
ऐकिल्या मजेच्या अद्भुत गोष्टी अशा
सोडिला किनारा आणि तयें आपुला !

—जातसे धुक्यांतुनि मार्ग तयाचा तिथें
मागें व पुढें अस्पष्ट दिसे सर्वही !
आंदोले त्याची आशा नौकेपरी !
ऐशाच कितीतरि गेल्या दिनयामिनी !

—वर हवेंत होती विहरत विहगावली !
हृदिं आनंदोर्मी उसळत होत्या किती !
निज मित्रांसह मग उतरुन भूमीवरी
रोविलें तयानें निशाण अपुलें तिथें !

—मग कळले त्याला "आलों कोठें तरी !
तें ध्येय मनांतिल दूरच परि राहिलें !"
सोन्याचा दिसला धूर न त्याला तिथें !
रस्त्यावर दिसली त्यासि न रत्नावली !

—परी आज तयाचें नांव जगीं गाजतें !
जे थोर तयांचें–असेंच सारें असे !
शोभतें तयांना–ध्येय न जरि लाभलें !
हांसें न होत परि नांव जगीं होतसे !

२७–८–३४ पुणें.

—चार झाले, घरांतुनी
आवाज ये 'स्टोचा' कानीं
चढे आधण चहाचें
येति क्षण आनंदाचे ! १
—तोंच वेळेवर कशी
पाण्याचीही गाडी येई.
पाणि शिंपडुनी थोडें
अंग भिजवुनी जाई ! २
—धन्य पोलिस तो !—त्याला
प्रदक्षिणा घालुनिया
पहा आवडती गाडी—
हात दाखवीत जाई ! ३
—शेजारीच संगिताची
सदा खैरात दुकानीं
ऐकुनी तो धूळ घेत
जाउ हवा खावयास ! ४
—आणि भवतीच्या गोड
पाहुनिया बंगल्यास
जाउं निःश्वास टाकित
मनांतल्या मनामधें ! ५
—ओळखीचे भेटे परी
ओळख न देई कुणी !
परी दृष्टि सूखावरी
तृप्त जो तो राहे जगीं ! ६

९-१-३५ कऱ्हाड.

झब्बू—

—आणि आवडता झब्बू
बसूं खेळत मजेंत !
करुं होऊं एकमेक
आनंदानें लंबकर्ण !
इथें सारेंच निराळें !
कफल्लका मान मिळे !
जो तो जिवापाड झटे
कफल्लक होण्यासाठीं !
परी नको तरी हातीं
राहतात राजेराण्या !

२४–१–३५ पुणें.

---

भग्न हृदयाचें अखेरचें गाणें—

देवा ! गुलाब नाहीं
घेऊनिया दिले तूं !
आतां तरी दयाळा !
चुकवूं नकोस पोळी !

२६–१–३५ पुणें.

---

खुळा—

—सहज मजला तो म्हणे, " सांग तूझें
प्रेम कोणावर असे बैसलेलें ? "
प्रश्न ऐकुनि विक्षिप्त असा त्याचा
हसूं आलें पण दाविलें न कांहीं !

—नांव कोणाचें तरी घ्यावयाचें
असें पडलें मजपुढें प्रश्नचिन्ह ?
आणि पोरींची रम्य चित्रशाळा
सहज नयनांसी लागली दिसाया !

—कशी ऐशा सौंदर्यसागराची
त्यास द्यावी मी कल्पना करूनी ?
फुलें होतीं मजसभोतीं अनेक
आणि होतीं आनंद मजसि देत !

—असें असतां घेऊन एक नांव
कसें हृदयानें कृपण मीं रहावें ?
तरी खोटें सांगून एक नांव
करुनि त्याचें टाकिलें समाधान !

—दार खजिन्याचें खुलें जाहलेलें
बघुनि त्याला किति समाधान झालें !
—आणि तेव्हांपासून मला आतां
नांव घेउन चिडविण्या लागतो तो !

२७–२–३४ पुणें.

विनोद डोंगरे

## फूल नाहीं फुलाची पाकळी—

—नवा होता लागलेला सिनेमा
तूं हि आली होतिस तो पहाया !
दर्शनाचें तव भाग्य इथें लाभे
म्हणुन वाटे मज रोज इथें यावें !

वरी खुर्चीवर खात शेंग खारी
सखे ! होतिस तूं करत चैन भारी !
बसुनि खुर्चीवर तुझ्या पायथ्याशीं
गोड दृश्यें मी बघत चित्तहारी !!

—रंग लागे चित्रास यावयाला
शिरीं कागद तों येई कोठुनीया !
काय आलें हें कुठुन–पाहिलें तों–
कळुनि आली कृति सकळ तुझी बाले !

—फूल नाहीं पण पाकळी फुलांची
मिळे–हेंही नच सखे भाग्य थोडें !

२५–३–३५ कऱ्हाड.

किणोरे

## सांपडलेला आनंद—

—परवा परवा भेट आपुली झाली तरि आज
होउनि गेले महिन्यावरती महिने त्या कैक
त्यानंतर ही भेट आपुली आज पुलावरती
अशी अकल्पित होई कैशी नवल किती सखये !

काय परी मी पाहतसे हें ! हाय ! कडेवरती–
बाळ गडे ! तव खेळत राही मोहनमाळेसी !
कसें नको तें होउनि जातें खिन्न मना करितें
बघतां बघतां आनंदाचें निधान हारपतें !

आणि कळे जेधवा: "कडेवर आहे बंधु तुझा !"
सखे ! तोच मज हारवलेला लाभे आनंद !

२९–१–३५ पुणें.

---

## भग्नदीप—

—आणि जो घेउनी आलों काच ती कंदिलावरी
घालुनी दूर कोठेंसा काळोखांतुनि चाललों !
हाय ! तो थेंब पाण्याचा अज्ञातांतुन येउनी
टाकले घालुनी पैसे सर्व पाण्यांत आमुचे !
असो. तें होउं दे सारें–! शोक कां करसी वृथा !
काय ती काच शोकानें जोडुनी मिळते पुन्हां ?
—होतें जें कंदिलामाजी राहिलें तेज कोंडुनी !
मोकळें होउनी दाही दिशा तें राहि व्यापुनी !

४–१–३४ कऱ्हाड.

✓ विंगोळे

## रेनकोट--

--असाच अवचित एके दिवशीं होइल मग भूकंप
टाकिल सारें असे नसे तें दडपुनिया भूमींत!
खुंटीवरचा रेनकोट नी डोईवरची टोपी
अमोल वस्तू जातिल ऐशा भूगर्भी निमिषांत!
उलथापालथ झाल्यावरही जातिल वर्षें कैक
आणि जगाची स्मृती येथली बुझेल आपोआप!
पुराणवस्तूसंशोधक कुणि येइल येथें हौशी
उकरायातें सहज लागुनी पाहिल तो ही भूमी!
दिसेल त्यासी रेनकोट मम मळकट आणिक जीर्ण
आणि न त्याच्या आश्चर्यासी राहिल पारावार!
म्हणेल तो :–‘हे काय लोक कीं ज्यांचीं ऐशीं वस्त्रें–
होतीं असती, ते असतील किति धिप्पाड आणखी उंच?’
१–८–३५ पुणे.

---

## आशा--

—आणून ठेवुनी खालीं मधुघट दोन
कुणिकडे तरी मग गेला ईश निघून!
उघडून जगानें सहज पाहिलें आंत
“सुख थोडें आणिक होतें दुःख अपार!”
हें असें दिलें तरि कसें विलक्षण त्यानें
कांहींच कळेना जगास गूढ तयाचें!
— रे! जरा धीर धर घेउनिया सुख सारें
येईल घरीं तव आनंदें परमेश!
२८–४–३४ विटें.

पाऊस—

——सारखा जरी असा
पाऊस पडेल हा
होईल काय दशा
धरेची ह्या ?

सारेंच जलमय !
आम्हीही जलचर !
मग त्या भेटतील
जलदेवी !

पाहून आम्हास त्या
होतील आनंदीत
हासत करतील
सुस्वागत !

परन्तू एकमेव
ह्रदयीं अनोळखी !
कराया भाव व्यक्त
भाषा कुठें ?

निःशब्द संभाषण
आजन्म करूनिया
सुखांत दिनरात
गोड करूं

१६–९–३५ पुणे.

---

कचदेवयानि—

[ विकृत रूपांतर ]

—आणि गुरुचा निज घेउनी निरोप
घरीं जाया तो निघाला सुविद्य
तोंच येउनि मग कन्यका गुरूची—
म्हणे—" कां रे ! मज त्यजुन सख्या जाशी ! "
अशी त्याची नव्हतीच कल्पना कीं
तिची येइल मागणी आपुल्यासी !
तोहि झाला मग गार—आणि ती ही
चकित झाली येतांच तो नकार !
तिनें त्यासी मग दिला शाप घोर—
म्हणे : " विद्या विफलाच तुझी जाण ! "
तोहि संतापुन वदे शापवाणी
" तुला नाहीं मिळणार वर कधींही ! "
तोहि गेला मग घरीं आपुलीया
तीहि झाली झणि दृष्टिआड त्याच्या !
—म्हणे तो " हें किति ठीक आज झालें
सकल विद्या मज होय पारखी ते !
कुणा कटकट ती हवी घटपटांची !
प्रबल ज्ञानाहुन अविद्याच लोकीं ! "
—म्हणे तीही : " हें बरें सर्व झालें !
लग्न होउनि तरि कोण सुखी झालें ?
करूं आतां उद्धार समाजाचा !
—जगीं श्रेयाचा मार्ग त्याविना ना ! "

२९–३–३५ कऱ्हाड.

---

**आदाम आणि ईव्ह—**

—वर्षांवर वर्षें लाखो होउन गेलीं
तरि विश्व विसरलें नांव न अजुनी त्यांचें !
सृजनाविण हातुन कार्य न कांहीं झालें !
तरि नांव तयांचें अखंड चालत राहे !
आजही तसे आदाम—ईव्ह जगिं कैक
आहेत परंतू भाव तया न जगांत !
—सर्वांच्या आधीं आले हे जगतांत
म्हणुनीच मिळाले तयांस "येणे—मार्क !"

१२—९—३७ कऱ्हाड.

---

**मूर्ति पाहून—**

जिच्यासाठीं दिनरात कष्ट केले
मूर्ति ती ही परिपूर्ण आज झाली,
तिला आनंदें बघुन साभिमानें
मनोभावें वंदिलें शिल्पकारें !
—बघुन मनिं ये " देवास मानवानें
जन्म दिधला निज कल्पनेप्रमाणें !
पहा निर्माता करित कसा येथें
स्वीय कृतिला साष्टांग नमस्कार !
—देवरायें निर्मिलें मानवासी
(हाय ! हेंही लागतें सांगण्यासी ! )
निर्मूनीया होतांच काय आम्हा
देव घाली साष्टांग नमस्कार ?

९—४—२९ कऱ्हाड.

—हें विशाल मंदिर सखे ! तुझ्या प्रीतिचें
जाहलें उभारुन आज नवें नवसाचें !
—पायांत सांडलें रक्त किती युवकांचें
हा प्रश्न कशाला उगाच मी करुं बाले ?

४–१०–३५ पुणें.

---

**फर्ग्युसन हिल**—

—सकाळीं सहज फिरायासाठीं
यावें तर ही ठायीं ठायीं
दिसतसे दुतर्फा वृद्धजनांची दाटी !
साहुनी ताप रवीचा भारी
यावें कधि वा सहज दुपारीं !
तर दिसती तेथें गाइगुरें चरतांना !
लागला दिवस सराया आतां
जावें म्हणुनी फिरण्याकरतां
तों दिसती युवजन चोहिंकडे फिरतांना !
वर्षतां चंद्र सुधारस वरुनी
यावें जर मी तवसंन्निधीं
तर येतील मजसी दिसुनि तेथ पिशाचें !
एकटी भेटसि तूं न कधींही
यावें तर मी सांग कशासी ?
असतात कुणी ना कुणी तरी तुजपाशीं !

२०–९–३४ पुणें.

---

**प्रेम आणि दाढी!—**

तुझी चित्तांतुनी मूर्ती पुसाया यत्न केला मी
परी जाई न ती येई—जसी ही ये पुन्हा दाढी!

१७–८–३३ पुणें.

---

**विगतप्राण सारमेय—**

—मोत्याचा धाकटा बंधू टिप्या गेलास घेउनी!
अरेरे! बालहत्या ही केली केलीस ईश्वरा!

१८–४–३५ कऱ्हाड.

---

**गनीमी कावा—**

('ब्रिज' खेळतांना)

"गनीमी आमुचा कावा, मराठी आमुचा बाणा!"
"नलो बोलूनिया नोट्रंप् करूनी दावितों आम्ही!"

२३–४–३५ कऱ्हाड.

---

## मोटार ड्रायव्हरचें प्रेमगीत—

आतां न टाकतां दृष्टि जराही इकडे
उडवीत अशी जा खुशाल मोटरगाडी!
परि होते तुजला मागें—एकदा
गांवास दूर कोठेंसें—जायचें
तेधवां देउनी " फ्रंटसीट "—तुजलागीं
मी नेलें होतें आठवतें ना तुजसी!"

(श्री. वा. भा. पाठक यांच्या "एका प्रसंगा"चें विडंबन)

२०–८–३३ पुणें.

---

## देवी येऊन गेल्यावर—

घाव टाकिचे सोसावे। देवपदासि मग जावें!
सोशियले मी घाव तसे। विपरित झालें हाय! परी!
होतें माझेपाशीं तें—गेलें कुठल्या कुणीकडे!
घाव सर्वही सोशियले—तशि मम सुंदरता गेली!
गेली सुंदरता तैशी—दृष्टी माझी विलोपली!
आणिक जें आलें काय—काय तेंच हो देवपण?

७–८–३० पुणें.

---

## "अनोळखी भेट" या कवितेचें विडंबन—

—होते आयतकर्ण श्वेतमुखि ती डोळे टपोरे तिचे
बांधा नाजुक डौलदार फिरवी ती कूर्च वाऱ्यांतुनी !
रानीं राहुनियां उभी, फिरतसे शोधीत ती भक्ष्यण.
दुग्धप्राशन पीत वत्स करितें आकंठ निःशंकसें !
—हें सारें बघुनी सुदृश्य मनिं ये, "कुक्षीं तिच्या येउनी
प्यावें सांज सकाळ दूध हुदडया स्वच्छंदशा मारुनी !"

३१–१–३५ पुणें.

---

## मेघ—

कोठेंही दिसुनी येतां, आरसा कसाही मार्गी,
वाकून तयांत बघूनी, मग आपण क्रमितो मार्ग,
तैसेंच पल्वलांच्या ह्या, आरशामधें निजरूप
पाहून फिराया जाती, मेघांचीं चिमणी बाळें !

२६–१०–३५ पुणें.

---

## अनुराग सप्तक—

१

—तारका गोड आकाशीं अंधारांत प्रकाशती
गोड पोरी जशा कांहीं अंतरींच्या तमामधें

२

अनुष्टुप् छंद तो त्याला एक नेम नसे गणीं
अनुष्टुप् अनुरागाचा एक नेम नसे कधीं !

३

सखे या प्रीतिसाम्राज्यीं द्यावया कर लागतो
साधी ही न तुला ठावी प्रीतिची रीत गोडशी !

४

सखे ! वक्त्यापरी केली प्रीतीला सुरुवात तों
हाय ! केलास तूं कैसा अध्यक्षापरि शेवट !

५

होती ती प्रीतिची पुंजी गेली केव्हांच संपुनी !
आतां बेकार होऊनी जगीं या दिन कंठणें !

६

प्रीतिश्रीज्ञान या माजीं इतिश्री होइ आमुची !
सन्निधी पोंचुनी त्यांच्या हातीं लाभे न कांहिंही !

७

रोख बाले ! तुझा आम्हां कांहीं केल्या न आकळे !
ओघ सिंधूपरी तूझा बदले वरचेवरी !

११–१०–३५ पुणें.

---

**शाकुंतल** [ नवी आवृत्ति ]—

—प्रेम सारें तिच्यापाशीं ठेवुनी नगराप्रती
येतां दुष्यंत पूर्वीची गेला विस्मरुनी स्मृती !
आज येतां प्रिया त्यांसी नाहीं ओळख लागली !
घरीं येतांच लोकांचें राहे प्रेम न अंतरीं !
जशी आली तशी गेली दुःखभारें शकुंतला
काय साऱ्याच पुष्पांच्या ललाटीं भाग्य हें वसे ?

—तीहि मानी, न ती ठेवी स्मृती याची निजांतरीं !
प्रेमासहि असे कांहीं मर्यादा जगतामधीं ?
काय विश्वांत या एक असे दुष्यंत भूपती '
कैक राजे तिच्यासाठीं राज्यत्यागार्थ इच्छिती !
अशा एकास आनंदें माळ घालोनिया तिनें
भूलोकीं स्वर्गसाम्राज्य स्थापिलें नवप्रीतिचें !

—नगरीं चैन दुष्यंता न पडे क्षण एकही
स्मृतिब्रह्मसमंधानें राजाला छळलें पुरें !
हिंडे पुरुरव्याऐसा गेलेलें श्रेय धुंडण्या
घरीं काय सदा राहे सुखाचा गार ताटवा ?
हिंडतां एकदां त्यासी कुमार दिसला कुणी
झालें तों हृत्सरामाजी घोर वादळ त्याचिया !

—हाय ! आली जरी आतां चूक ध्यानांत आपुली
तरी गेलेंच तें गेलें पुन्हा केव्हां न लाभलें !

२१-११-३५ पुणें.

---

**तिचें प्रेम—**

—-तयावरती जरि प्रेम तिचें होतें
तरी ठरलें ना लग्न तिचें त्यासी !
प्रीति आणि श्रीविहिन तो जिवाची–
करुन घेई कशितरी फसवणूक !

—एक दिवशीं मग तिच्या मैत्रिणीनें
प्रश्न केला तिज गोष्ट काढुनी ही !
" सखे ! इतुकी तव असुन प्रीति त्यासी
असें कां तूं ढकलिलें दुःखपंकीं ? "

—-तिला सांगे ती " असे प्रीति माझी;
म्हणुन त्यांच्या हें सकल हितासाठीं !
पहा कैसे दिन कठिण कंठती ते !
किती त्यांचा छळ दैव करत राहे !

—अशी त्यांची स्थिति—त्यांत मी कशाला
सांग सखये ! तर होउं भार त्यांना ?
नको त्यांच्या जीवास किमपि त्रास
म्हणुन केवळ हें योजिलें मनांत ! "

२६–६–३६ कऱ्हाड.

## एक सत्यकथा—

—काव्य केलें–आलें न परी कांहीं
प्रेम केलें–जमलें न परी कांहीं !
असा होउनिया जाय तो हताश !
आणि गेला सोडून मृत्युलोक !

—पुढें एकहि कावळा या जगांत
हाय ! पिंडाला तयाच्या शिवे न !
मित्र त्याचा जवळींच दु:खिकष्टी
बसे लावुनिया हात कपाळासी !

"काव्य तूझें मी करिन रे ! प्रसिद्ध
तुझें देणें टाकीन देउनीया !"
असा दिधला आत्म्यास धीर त्यानें
तरी पिंडाला शिवेनाच काक !

सर्व तिष्ठत राहले कैक वेळ
काय कवीला पाहिजे तें कळे न !
तोंच दुसरा बोलला मित्र त्याचा
"प्रेम तूझें–नेईन पूर्णतेला !"

—असें वदतां पाहिलें जों समोर
तोंच पिंडीं धावला काक एक !

३०–१२–३७ कऱ्हाड.

**The Day of Judgment—**

—-आज उद्यां तरी निर्णयदिन
उगवेल अशी आशा धरुन
काळनगरांत घोर तमांत
बसलेत जीव वाट पहात!
—कुठला तो दिन!–कुठलें काय ?
आहेत ते सारे एप्रिल फूल!

८–२–३६ पुणें.

---

## विगतप्राण सारमेयास—

—-शांत नीज घेई माझे तूं भाई–!
जागवूनी जन श्रमसी भारी!
गळसरी जरी कंठीं न तूझ्या
तरी त्रासवाया न ये सोजीर!
पळाले ते तूज पाहून दूर
आज जीवास त्या पडे आराम!
गांवांतील थोर नगरसभा
देह तिचा झिजे तुझे कारणी
तुझ्यामुळें तिचे लागून पाय
आळी आमुची ही होतसे धन्य!

२७–११–३५ पुणें.

---

## सुटलों बुवा!

कवि पंडित सप्रे यांच्या काव्याविषयीं

# निवडक अभिप्राय

....थोडक्या शब्दांत जास्त अर्थ आणण्याची त्यांची हातोटी फार थोडयांना साधते.... विशेष म्हणजे त्यांत मार्मिकता, सूक्ष्म विनोद व उपरोध यांच्या छटा पाहावयास मिळतात.

—**प्रि. अत्रे**, बी. ए., बी. टी., टी. डी. (उपहासिनी प्रस्तावना)

* * *

पंडित सप्रे यांच्यासारखे काव्यांत कुशलतेनें उपरोध व्यक्त करणारे कांहीं उदयोन्मुख कवि सोडले तर मराठींतील आजच्या विडंबनपर कवितेंत टीकेचें वैशिष्टय अगर कल्पकतेची चमक बिलकूल आढळत नाहीं.

—**वि. स. खांडेकर** (स्फूर्तिलहरी)

* * *

पंडित सप्रे यांची कविता त्रुटित असली तरी मनावर टिकाऊ परिणाम केल्याशिवाय राहात नाहीं.

—**विहार**

* * *

याशिवाय कवि गिरीश, श्री. य. गो. जोशी, प्रो. वाडेकर, प्रो. वाटवे, सौ. कुमुदिनी काटदरे जी. ए., वगैरे साहित्यिकांचे उत्कृष्ट अभिप्राय.

**पुढील प्रकाशनें—वादळ : लेखक :—बा. कृ. गलगली**

**प्रकाशक—दयार्णव कोपर्डेकर, 'प्रकाश मंडळ'**

**५२९ सदाशिव पेठ, पुणें २.**